महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मध्ये सुधारणा करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: साविअ-२०२५/प्र.क्र.४५/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
दिनांक : १७ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अकृषि सार्वजनिक विद्यापीठांची विद्याविषयक स्वायत्तता व अत्युच्च गुणवत्ता, लोकशाही प्रक्रियेद्वारे पर्याप्त प्रतिनिधित्व, उच्च शिक्षणाची अभिवृध्दि, त्यांचे बळकटीकरण व विनियमन यांकरिता आणि त्यांचेशी संबंधित तद्अनुषंगिक बाबीकरीता तरतूद करण्याकरिता महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ राज्यामध्ये लागू करण्यात आलेला आहे. राज्यातील अकृषी विद्यापीठे व स्वायत्त महाविद्यालयामध्ये तसेच संलग्नित महाविद्यालयामध्ये अभ्यासक्रमासाठी राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० ची अंमलबजावणी शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून सुरू करण्यात आलेली आहे. तसेच शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून संलग्नित महाविद्यालयातील पदवी अभ्यासक्रमासाठी अंमलबजावणी करण्यात येत आहे. राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० च्या अनुषंगाने तसेच शैक्षणिक क्षेत्रात होऊ घातलेल्या बदलांच्या अनुरूप महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मध्ये आवश्यकतेनुसार सुधारणा करण्यासाठी एक उच्च स्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उच्च शिक्षण क्षेत्रात झालेला अमुलाग्र बदल, नवीन शैक्षणिक प्रवाह इत्यादीच्या पार्श्वभूमीवर उच्च शिक्षण अधिक सुसंगत, संशोधनात्मक, रोजगारक्षम असणे व ते समाजातील सर्व घटकांना सहजरित्या उपलब्ध होणे आवश्यक आहे. महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियमाद्वारे उच्च शिक्षण देणाऱ्या विविध शैक्षणिक संस्था, महाविद्यालये, विद्यापीठे इत्यादी मध्ये निकोप व पोषक असे वातावरण निर्माण करुन विद्यार्थी हाच उच्च शिक्षणाचा केंद्रबिंदू मानून त्या दृष्टीने नियोजन करणे आवश्यक आहे.

२. राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० च्या अनुषंगाने तसेच शैक्षणिक क्षेत्रात होऊ घातलेल्या बदलांच्या अनुरूप महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ मध्ये आवश्यकतेनुसार बदल होणे अपेक्षित आहे. यासाठी राज्य शासन खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास मान्यता देत आहे.

| अ.क्र. | सदस्यांचे नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ. नितीन करमळकर, माजी कुलगुरू, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे | अध्यक्ष |
| २ | डॉ.डी.टी.शिर्के, कुलगुरू, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | सदस्य |
| ३ | डॉ. उज्वला चक्रदेव, कुलगुरू, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ४ | डॉ. राजनीश कामत, कुलगुरू, डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ५ | डॉ. आर.एस. माळी, माजी कुलगुरू, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव | सदस्य |
| ६ | डॉ. परवीन सय्यद, वरिष्ठ कायदा अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ७ | श्री. दिलीप भरड, कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक | सदस्य |
| ८ | संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई | सदस्य |
| ९ | संचालक, उच्च शिक्षण, पुणे | सदस्य सचिव |

३. समितीची कार्यकक्षा:-

१) समितीने सध्या अस्तित्वात असलेल्या अधिनियमातील सर्व कलमांचा अभ्यास करुन सुधारणा करणे आवश्यक आहे.

२) सुधारित नविन अधिनियम हा केंद्र शासनाच्या राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० शी सुसंगत असावा.

३) समितीने शिफारस करतांना राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अवलंबिल्या जात असलेल्या उपाययोजनांचा व अधिनियमांचा विचार करावा व सदर अधिनियमातील कलम स्वयंस्पष्ट व सुटसुटीत असावीत.

४) समितीने व्यवहार्य (Practical), वस्तुनिष्ठ (Physical) व अंमलबजावणी करता (viable) येतील अशा शिफारशी कराव्यात.

५) समितीने आपला अंतरीम अहवाल शासनास ३ महिन्यात सादर करावा.

४. समितीला आवश्यक ती सर्व प्रशासकीय मदत सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे यांनी उपलब्ध करुन द्यावी. तसेच समितीसाठी बैठक भत्यासह येणारा संपूर्ण खर्च विद्यापीठाने त्यांच्या निधीतून विद्यापीठाच्या नियमावलीप्रमाणे करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१७२०३४३२८८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.04.17 20:41:46 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल कार्यालयाचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) कार्यालयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) कार्यालयाचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाज़गी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
६) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाज़गी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
७) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई-३२.
८) डॉ. नितीन करमळकर, माजी कुलगुरू, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
९) डॉ.डी.टी.शिर्के, कुलगुरू, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.
१०) डॉ. उज्वला चक्रदेव, कुलगुरू, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.

११) डॉ. राजनीश कामत, कुलगुरू, डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई.
१२) डॉ. आर.एस. माळी, माजी कुलगुरू, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.
१३) डॉ. परवीन सय्यद, वरिष्ठ कायदा अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
१४) श्री. दिलीप भरड, कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक.
१५) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७) सर्व सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती(विशि-४).